नाशिक विकास कार्यक्रम, २००९ अंतर्गत सुरू करण्यात आलेल्या आदिवासी क्षेत्रातील आदिवासी उपयोजनांतर्गत ७ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/ केंद्राकरिता प्रथम टप्प्यात मंजूर करण्यात आलेल्या एकूण २८ अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अपमु-२०१८/प्र.क्र.४२/व्यशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १२ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :** १) संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/ मुदतवाढ/२०१८/(१६/१९)/१२६५,दिनांक ६/०९/२०१८.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.व्हीओसी-२०१०/प्र.क्र.१२४/०९/व्यशि-४ दि. ३०/४/२०११.

३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.अपमु-२०१८/ प्र.क्र.४२/ व्यशि-४, दि. २८/०६/२०१८

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि.७/०९/२०१८

**प्रस्तावना :**

नाशिक विकास कार्यक्रम, २००९ अंतर्गत सुरू करण्यात आलेल्या १३ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्राकरीता प्रथम टप्प्यात एकूण ५२ पदे निर्माण करण्यास शासन निर्णय दि. ३०/४/२०११ अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर ५२ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१२ पासुन आतापर्यत दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाअन्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर ५२ पदांपैकी २८ अस्थायी पदे **आदिवासी क्षेत्रातील आदिवासी उपयोजनांतर्गत ७** शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र यामधील आहेत. सदर अस्थायी पदे पुढे चालु ठेवणे आवश्यक असल्याने, या अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१८ पासून दि. २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

नाशिक विकास कार्यक्रम, २००९ अंतर्गत सुरु करण्यात आलेल्या **आदिवासी क्षेत्रातील आदिवासी उपयोजनांतर्गत ७** शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/ केंद्राकरीता प्रथम टप्प्यात मंजूर करण्यात आलेल्या खालील एकूण २८ अस्थायी पदांना, दिनांक ०१/१०/२०१८ पासून दिनांक २८/०२/२०१९ पर्यत मुदतवाढ पुढील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बॅड | ग्रेड वेतन | |
| १) | मुख्याध्यापक (गट ब) | ९३००-३४८०० | ४८०० | ७ |
| २) | सहाय्यक अधिव्याख्याता (गट क) | ९३००-३४८०० | ४३०० | ७ |
| २) | निदेशक | ५२००-२०२०० | २८०० | १४ |
| | **एकूण** | | | **२८** |

**अटी व शर्ती :-**

(१) ज्या प्रयोजनासाठी उपरोक्त पदे निर्माण करण्यात आली आहेत, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्यात यावा.

(२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही, याची खात्री करुन घेण्यात यावी.

(३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास, तसेच सुधारीत आढाव्यास (नव्याने निर्माण केलेली पदे आकृतीबंधात समाविष्ट करुन) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची दक्षता घेण्यात यावी.

२. या पदावरील खर्च **आदिवासी क्षेत्रातील आदिवासी उपयोजनांतर्गत ७** शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, केंद्राकरीता या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या पदांचे वेतन व इतर अनुषंगिक भत्ते मागणी क्रमांक झेड ए-१, २२०३, तंत्र शिक्षण, ००३ प्रशिक्षण, (०१) शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, (०१)(०५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातंर्गत विविध योजनांसाठी पद निर्मिती, (२२०३ ३५१३) ०१, वेतन या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. ०७/०९/२०१८, अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१४५०३३६८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.10.12 15:33:39 +05'30'

**( संतोष वि. रोकडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१
२) सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, (संचालनायामार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

६) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

७) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालये (संचालनायांमार्फत)

८) मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा /केंद्र तथा कनिष्ठ महाविद्यालये / प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ( सर्व संचालनालयांमार्फत)

९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( संचालनालयांमार्फत)

१०) उपसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर (संचालनालयामार्फत)

११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागर कार्यालय (संचालनालयामार्फत)

१२) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यशि-१, व्यशि-२, व्यशि-३, )

१५) निवड नस्ती.